दिनांक ६ सप्टेंबर २०१० वर्ष दुसरे, अंक २७

साहित्य प्रतिष्ठान

# कातरवेळ




संपादक

**सचिन काकडे (मुंबई)**

अतिथी संपादिका

**अनघा वसंत जोशी (मुंबई)**

सह संपादक

**सोनाली घाटपांडे (पुणे)**
**स्वप्ना कॊल्हे (नाशिक)**
**भारती सरमळकर (मुंबई)**

पेज आर्टवर्क

**अमृता ढगे (मुंबई)**


## ई अक्षरी

# संपादकिय

## कातरवेळ . . संध्याकाळची कथा

किना-याशी संध्येच्या कथा सुरु झाल्या कि एकांताच्या पोटात दुखायचं, आठवणींनी एखादी ‘लाट’ आणायची अन, त्याच्या डोळ्यात सोडायची काही दिसेनासं झालं कि. . .त्याला गाज ऐकु यायची. . .समोर लाटांवर कुणीतरी. . .सांगतय. . .हसतय. . .खेळतय. . .अन, बोलावतय. . .खुणावतय. . .तो अनवाणी धावायचा आठवणी मागे असायच्या पण. . . पायाखाली जोवर वाळु आहे तोवर पाणी जवळ आलं कि. . .त्या मागच्या मागे विरघळायच्या, दिशा कुत्सित हसायच्या.... देहभर दाटलेल्या कळा घेऊन, फ़ेसाळणा-या डोहात,अस्तास जाणा-या सुर्यासमोर, गुदमरणा-या श्वासांनी तो “ति”ला जन्म द्यायचा.. अन संध्येस मरण मागायचा..



एकांताच्या गर्भातुन बाहेर येणारी “अविरत घुसमट”
अन, एकांताचं बाळंतपण जपणा-या “आठवणी”
कातरवेळी संध्येला या अश्या कथा सुचतात तरी कश्या?

**सचिन काकडे**
संपादक (मुंबई)

# अतिथी संपादिकेच्या लेखणीतुन...



**अनघा वसंत जोशी (वसई)**
अतिथी संपादिका

नमस्कार !!

**"नेटाक्षरी"** सोबत अतिथी संपादक म्हणुन काम करणं आणि त्यातही कातरवेळेसारख्या विषयावर म्हणजे हा विषय गंभीर असुनही माझ्यासाठी आनंदाचा प्रहर जाणवत आहे. **'कातरवेळ'** प्रत्येकाच्या आयुष्यप्रहरात एकदातरी हटकुन येणारी . मग तीला सोबत मावळतीच्या सुर्याची असली काय किंवा वृद्धपणाची असली काय. . दोन्ही सारख्याच.

पण .. माझ्यासाठी कातरवेळ म्हणजे समुद्रकिनारी बसून मावळतीच्या सुर्याकडे पाहत जुन्या आठवणींना उजाळा देणारी. . . असं म्हणण्यापेक्षा मनात रुतलेला आठवणींचा काटा.. अलगद ..काढ़णारी अन, डोळ्यात जरा थेंबभर पाणी ठेवुन जाणारी सांजवेळ. . . . शांत समुद्रकिनारा...फ़ेसाळत्या लाटा...आकाशात पसरलेला तांबुस प्रकाश...आणि अस्ताला जाणारा तो सुर्य... हे असं असताना कुणीही जुन्या आठवणीत हरवेलच मग माझ्यासारख्या स्वप्नवेडीची काय कथा ?

त्यात दोष ना किना-याचा.. ना सुर्याचा.. दोष म्हणावा तर तो "त्या" वेळेचा... ही वेळ, अशी रोज येणारी; पण एका वेगळ्याच विश्वात नेणारी..अनामिकशी हुरहुर लावणारी.. कुणाची आठवण करुन देणारी... 'तो' नसल्याचं सत्य पुन्हा पुन्हा जाणिव करुन देणारी... आणि कुठेतरी मनाला हताश करणारी...

## अतिथी संपादिकेची ओळख

### नाव - अनघा वसंत जोशी (स्वप्नवेडी)

राहणार - वसई, मुंबई, यावर्षी B.Sc बायोटेक पुर्ण सध्या रुईया कॉलेज मधुन M.Sc पदवीचा अभ्यास करत आहे. लिहिण्याचा छंद शाळेपासुनचा पण सगळं लिखाण डायरीपुरतंच मर्यादित असायचं दिड वर्षांपूर्वी **"काव्यांजली"** कम्युनीटीसारखं कवितांच उत्तम व्यासपीठ सापडलं तेव्हापासून लेखनाला वाव आणि कवितांना नवी डायरी मिळाली. **नेटाक्षरी**ची नियमित वाचक हिच सध्याची साहित्यातली ओळख.

राहुन राहुन तेच तेच आठवतय..
बंद मुठीतुन वाळु निसटुन जावी,
तसा गेलास, अलगद...
आणि...
मी मात्र,
वाट पाहत राहिले वेड्यासारखी
कधी तरी येशील, या आशेने..
आजही इथे येउन बसते.
स्वतःच्याच हाताकडे पाहत
वाटतं कुठुनतरी येशील तु
अन,
या माझ्या हातात हात गुंफुन
म्हणशील.......

**"ए वेडाबाई , अशी का बसलीयेस ?**
**आणि काय मागतेस त्या सुर्याकडे ?**
**तो तर स्वतःच अंधारत चाललाय. . !!"**
आणि...मग हातावर पडलेल्या थेंबाकडे
बघुन स्वतःच भानावर येते
मग...कळतं
आपल्या मनाचं आभाळ
दाटून आलय आणी ते बरसणार...
कारण, हे काळे ढ्ग दूर नेणारा
वाराच आता हरवलाय...
का ? गेलास रे मला असा सोडुन ?
कळेना माझं काय चुकलं ?
वाटतं कधी तरी येशील
अन म्हणशील,
**"अगं..., गंम्मत करत होतो रडूबाई ,**
**काय अवस्था करुन घेतलीस..."**

आणि.. माझे विस्कटलेले कसे सावरुन
हळुच मला जवळ घेशील
पण...
त्याच वेळेस दुसरं मन म्हणतं
नाही तो नाही येणार...
गेलाय तो खूप दूर...
त्याच्या जगात तु नाहीसच
तुझ्याकडे फ़क्त **खुणा**
त्याही जाणा-या पावलांच्या
येणा-या पावलांनी
फ़क्त आठवणींच येतात .
खुणा आठवणीच्या
अश्याच एखाद्या वेळी मनाला
एकटेपणाची आठवण करुन देणा-या...
आणि...
न सरणा-या या क्षणांना
अगदीच कठीण करणा-या...

मग, इतका वेळ समजावलेल्या मनाला **ग.**
**दि. मां.** च्या ओळी पटतात

**"या कातरवेळी, पाहिजेस तु जवळी..."**



**अनघा वसंत जोशी (स्वप्नवेडी)**
**(वसई)**
अतिथी संपादिका

# कातरवेळ

मन उधाण असते
रेती सरकत असते
जीवात जीव नसतो
ती कातरवेळ... ...।।

तु हलकेच येतेस
हातात हात अलगद देतेस
हात सुटुन कधी जातो उमगत नाही
ती कातरवेळ... ...।।

भरती मनासारखी
ओहोटी तुझ्यासारखी
मनात काहुर का उठते कळत नाही
ती कातरवेळ... ...।।

संध्याकाळ रात्रीच्या गर्तेत जाते
मी आणि मन तसेच राहते
रात्र दिवसात कधी बदलते कळत नाही
ती कातरवेळ... ...।।

कधीतरी कुठल्या लाटेसोबत देह माझा
तुझ्याच बेटावर सापडतो लोकांना
तो सोबत असतो म्हणुन
तुला ओळख देता येत नाही
तीच अन,
तीच उरते कातरवेळ... ...।।

**प्रसाद जोशी (पुणे)**

# कातरवेळ

अंधरांची थरथर,
डोळयांची भाषा
सांगायाचे आहे बरंच काही
काही सुचतच नाही...
कातरवेळ ... ...

तुझी माझी पहिली भेट
अशीच ती संध्याकाळ
हुरहुर वाटे जीवा...

कातरवेळ... ...
कशी होईल आपली भेट
कसा असशील तु
कशी होईल तुझी मी
एक अनामिक भीती

प्रेमात पण भीती?
कातरवेळ... ...
घेतलस जवळ मला,
आणि प्रेमाने स्पर्शिलेस
हुरळुन गेले मी,
पण...मनात एक अनामिक डर

कातरवेळ... ...
घाबरलेले मी
अन, आश्वासक तु
तरी मनातल्या मनात
मिटलेले मी
बस...
कातरवेळ. . . कातरवेळ. . .

**सुनील जोशी (नागपूर)**

# कातरवेळ

निघतानाच पाउल अडते,
क्षणभर अगदी क्षणभर...
डोळयांमध्ये फ़ेसाळत राहति
आठवणींचा समुद्र
उंच गेल्या अहंकाराच्या
फ़ांदीवरती..,
जमा होतात,
शंका कुशंकांचे पक्षी
आणि त्यांच्या किलबिलाटाने
खोल खोल गेलेल्या
विश्वासाची मुळे
मोकळी होतात
आपलेपणाच्या मातीतुन
उन्मळुन पडतं...
एक नात्याच झाड
आणि जपला जातो
अहंकाराचा बोन्साय...

कातरवेळ ही अशीच असते ? ?



**आनंदा माने (सोलापुर)**

कातरवेळ अशीच असते
अचानक दाटुन येणारी..
मनाला कल्पना नसताना,
विचारांच्या गर्दीत नेउन सोडणारी
व्ही. टी . मागे पडत चाललेलं...
आणि डोळे सायनच्या दिशेने लागलेले
पण मन. .
मात्र तीच कातरवेळ आठवत..
वरळी किना-यावरल्या खडकावर बसुन
मक्याचे दोन दाणे तोंडात टाकत..
त्या बुडत चाललेल्या सुर्याशी गप्पा मारत

सुर्य म्हणतो,
कातरवेळ ही अशीच असते
गार वारा आणणारी
दिवसभर तापलेल्या मला हलकेच
एक झुळुक येउन भिडणारी
तु आज एकटाच . .??
आज तो नाही आला ? बरोबरच आहे. . .
व्ही. टी . मागे पडल्यावर
डोळे सायन कडे लागले असणार त्याचे
आणि तु .. तु आलास निघुन नेहमीसारखा
आपला करार झालाच होता
तु येणारच. . .
जोपर्यंत मी
'तिच्या' सकट समुद्रात बुडायचं
थांबवत नाही . . .
तोपर्यंत तु येणारच. . .

कातरवेळ ही अशीच असते
किनाराही म्हणायचा
आमच्या दोघांच बोलणं ऐकुन
मनातल्या मनात हसायचा
एकाच कातरवेळी कधी तुझी ती
सुर्याचा पाठलाग करत करत
समुद्रात बुडाली ना ?
आणि तु
वेड्यासारखा शोधतो आहेस तिला
सुर्याकडे . . .हा हा हा हा . . .
एकदाही वाटलं नाही तुला
किना-याला विचारावं कि
कि कदाचित समुद्राने तिला
तुझ्याकडे तर
नाही ना आणुन सोडलं ? ?
जाउ देत . . .

ती गेल्यापासुन प्रत्येक
कातरवेळ ही अशीच असते
गेले तीन दिवस मात्र
जोशी काका आले नाहीत
नातेचा हात धरुन फ़िरायला
कदाचित
कातरवेळ सरलेली दिसतेय
तु जा परत
गाडी सायनला पोहोचत आली असेल

मन परत येतं
गाडी स्टेशन मध्ये शिरते
आणि शेजारी उभा असलेला
एक समवयीन तरुण
डोळयांनीच हसतो अन म्हणतो,
कातरवेळ ही अशीच असते



**शंतनु चंद्रात्रे (नाशिक)**

# कातरवेळ

लांबलेल्या सावल्या अंधुक होत आहेत
पुर्ण विरल्या नाहीत अजुन
रंग गडद होत चालले आहेत

अजुन अस्तित्व राखुन आहेत
अजुन रात्र झालीच नाही
दिवस सरला नाही

ही वेळ कातरवेळ
अजुनही परतले नाहीत जे
त्यांच्या येणाची वाट आहे

येणार ते परतुन आस आहे
तो पहा एकच पक्षी पखांना गती देत
घरट्याकडे परतत आहे

कुणाचातरू झपझप चालण्याचा आवाज येतोय
घराकडे परतण्याची घाई आहे
कोणीतरी त्याची वाट पहात दारात उभी असेल

कावरी बावरी झाली असेल
कातरवेळ . . . आस लावणारी वाट पाहायला
लावणारी
सारे काही स्तब्ध , शांत , निश्चल. .

वर्तमानाचे भुतकाळात रुपांतर होतय
भविष्यकाळाचे वर्तमान होतेय
हा एक क्षण मनात साठवुन ठेवायचाय

हा शुन्यकाळ ही कातरवेळ
दिवस रात्रीकडे झुकतोय
अंधारात विलीन होतोय

अजुन रात्र नाही, दिवसही नाही
शुन्य , शुन्यतेचा अनुभव ह्या कातरवेळी
ही कातरवेळ माझी वेळ फ़क्त माझ्यासाठी



**रजनी अरणकल्ले (पुणे)**




कातरवेळ

कातरवेळ भिरभिरते
भरल्या घरात शिरते
हुरहुरते. . . अन,
एकट्याच्या मनात संधिप्रकाश कालवते
सगळयांचे डोळे चुकवत
एक अश्रु पापणीवर येतो. . .थबकतो
दुरवर कुठेतरी वाजणारी वायोलीन समेवर आली
की  मग.. .
गालावरुन घसरतो. ..
घरभर पसरतो. ..

**डॉ. सचिन जायभाये (मुंबई)**

ना पुर्ण उजेड
मात्र,
अपुर्ण काळोख असतो.
संभ्रम मनाला, पुन्हा पुन्हा,
मागे वळुन पहायची
हीच एक वेळ असते...
कातरवेळ ही अशीच असते...

**डॉ. विजय बेकनाळकर (मुंबई)**

# कातरवेळ

कातरवेळ
दबकत येते
मांजर पावलांनी
पसरत जाते सर्वांगात
सापाच्या विषासारखी

कातरवेळ
दिवस रात्रीच्या सीमा रेषेवर
गाठतेच अवचित
उभीच राहते, अचानक समोर
दरोडेखोरासारखी

कातरवेळ
दुकट्याला कधीच दिसत नाही
दिसलीच तर त्रासत नाही
येतेच, पण एकटं असताना
सोबत मागितल्या सारखी

कातरवेळ
उकरुन काढते , आठवणींचे भुयार
एकावर एक, आणखी एक
संपतच नाही
अंतच नसल्यासारखी



**डॉ. अशोक कुलकर्णी (पुणे)**

# कातरवेळ

सुर्य अजून बुडालेला नाही
ढगांच्या मागे थोडी प्रकाशाची तिरीप आहे
पल्याड दिवस झालेला नाही
अल्याड दिवेलागणी, इथे रात्र समीप आहे

वारा घोंगावतो माझ्या ग्लासात
मला त्याचीच थोडी पिसाट झिंग चढते
तसच कुणीतरी घोंगावत मनात
आठवणीची दाटी , आभाळही कातर भासते

घरात दिवा लावलेला नाही
काही काळ सावल्यांशी मला खेळत राहायचय
चंद्र अजून उगवलेला नाही
वरच्या कुणालातरी असच काहीतरी करायचय

कुठलंतरी काम आठवत अखेर
आणि मी उठते , आत जाउन दिवा लावते
ढगही पांगतात , चंद्र दिसतो
आणि ती हळवी, कातर, सांजवेळ, तेव्हा सरते



**डॉ. अनुश्री वर्तक (ठाणे)**



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ७५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

---

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या,
ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण,
तो आणि ती, प्रियेचे अभंग,
देशी दारुचे दुकान-3D, ई-शाळा,
तो, मी आणि सिगरेट, मोरया

---

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**